नागपूर जिल्ह्यातील नरखेड तालुक्यातील सन १९९१ मधील अतिवृष्टी/ पुरामुळे बाधित १५ पूर पुनर्वसित गावामध्ये नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - एफएलडी-२०२०/प्र.क.६३/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक- १२ मे, २०२२

वाचा -

१) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.सीएफएल ५९९१/सीआर ६०८/म-३, दि.०६/०८/१९९१

२) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.जीटीएल/एफएलडी-१०९१/प्र.क्र.१३२६/र-१२, दि.७/१२/१९९१

३) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.जीटीएल/एफएलडी-१०९१/प्र.क्र.१३२६/र-१२, दि.२१/०४/१९९२

४) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.सीएफएल ५९९१/सीआर ६०८(२)/म-३, दि.१२/०८/१९९१

५) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.आरपीए-२००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९

६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५

७) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६

८) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र. मशा/ कार्या-७(३)/प्र.क.५८/कावि-४९७/२०२०, दि.२८/०३/२०२२

**प्रस्तावना-**

वर्धा नदीला सन जुलै १९९१ मध्ये अतिवृष्टीमुळे महापूर आला होता. त्यामध्ये बाधित झालेल्या कुटूंबाचे पुनर्वसन करण्यासाठी शासनाने दि.२१/४/१९९२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानूसार पुनर्वसित भागात नागरी सुविधा कामांना संदर्भ क्र.८ येथील विभागीय आयुक्त, नागपूर यांच्या पत्रान्वये सादर केलेल्या नागपूर जिल्हयातील नरखेड तालुक्यातील १५ पुनर्वसित गावांच्या २६ नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

**नागपूर जिल्हयातील नरखेड तालुक्यातील १५** पूर पुनर्वसित गावांतील २६ नागरी सुविधा कामांच्या एकूण रु.१६४३.९०/-लक्ष (**अक्षरी सोळा कोटी त्र्येचाळीस लक्ष नव्वद हजार फक्त**) इतक्या रक्कमेच्या खालील २६ अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**(रुपये लाखात)**

| अ क्र | पूरबाधित गावाचे नाव | तालुका | नागरी सुविधा काम | अंदाजपत्रक रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | मौजे सायवाडा (अंबाडा) | नरखेड | ग्रामपंचायत भवन बांधकाम करणे | ३६.१७ |
| २ | मौजे सायवाडा (अंबाडा) | नरखेड | पोचरस्ता बांधकाम करणे | ३९.८८ |
| ३ | मौजे सायवाडा (अंबाडा) | नरखेड | नाली बांधकाम करणे | २३.८१ |
| ४ | मौजे खारगड | नरखेड | नाली बांधकाम करणे | २३.८१ |
| ५ | मौजे थडीपवनी | नरखेड | ग्रा. प. भवन बांधकाम करणे | ३६.१७ |
| ६ | मौजे थडीपवनी | नरखेड | खडी रस्ते बांधकाम करणे | ९७.२३ |
| ७ | मौजे थडीपवनी | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ९९.२३ |
| ८ | मौजे खेडी ( खरबडी) | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | २३.८१ |
| ९ | मौजे खरबडी | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | २३.८१ |
| १० | मौजे महेंद्री | नरखेड | ग्रा. प. भवन बांधकाम करणे | ३६.१७ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ११ | मौजे महेंद्री | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ३२.७३ |
| १२ | मौजे पेठमुक्तापूर | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ९८.७९ |
| १३ | मौजे जलालखेडा | नरखेड | अंतर्गत खडी रस्ते बांधकाम करणे | ९७.२३ |
| १४ | मौजे जलालखेडा | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ९८.७९ |
| १५ | मौजे मदना | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ७१.७१ |
| १६ | मौजे देवग्राम | नरखेड | अंतर्गत खडी रस्ते बांधकाम करणे | ९७.२३ |
| १७ | मौजे देवग्राम | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ९८.१९ |
| १८ | मौजे खैरगांव | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ९८.१९ |
| १९ | मौजे खैरगांव | नरखेड | अंतर्गत खडी रस्ते बांधकाम करणे | ९७.२३ |
| २० | मौजे देवळी | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ९८.१९ |
| २१ | मौजे देवळी | नरखेड | अंतर्गत खडी रस्ते बांधकाम करणे | ९७.२३ |
| २२ | मौजे सहजापूर | नरखेड | अंतर्गत खडी रस्ते बांधकाम करणे | ४२.२८ |
| २३ | मौजे सहजापूर | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | २९.७६ |
| २४ | मौजे नायगाव धोटे | नरखेड | अंतर्गत खडी रस्ते बांधकाम करणे | ५०.७३ |
| २५ | मौजे नायगाव धोटे | नरखेड | अंतर्गत नाली बांधकाम करणे | ३५.७१ |
| २६ | मौजे नायगाव धोटे | नरखेड | पोच रस्ता बांधकाम करणे | ५९.८२ |
| | **एकूण** | | | **१६४३.९०** |

**अटी व शर्ती :-**

१) नागरी सुविधा कामे करताना प्रस्तुत प्रस्तावित समाविष्ट असलेले गौण खनिज स्वामीत्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जीटीएन १०८३ /२१७/र-१२, दि.१०-०२-१९८३, शासन निर्णय क्र. आरसीपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१-०८-२००९ व शासन परिपत्रक क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८-०३-२०११ अन्वये पुनर्वसित/ विस्तारित गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकांतील रकमेपेक्षा अधिक होणार नाही, याची संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहित कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या संबंधित अधिक्षक अभियंता व संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, नागपूर यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित कराव्यात व तत्संबंधात जिल्हाधिकारी, नागपूर यांचेमार्फत शासनाच्या पुनर्वसन विभागास अवगत करावे.

६) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग कार्य नियमावलीतील प्रचलित नियमांनुसार सदर नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या अधिक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केलेली असावी.

७) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामे यापूर्वी अन्य कोणत्याही योजनेतून करण्यात आलेली नाहीत. अथवा सदरची कामे अन्य योजनेत समाविष्ट नाहीत, असे या कामांवर यापूर्वी खर्च करण्यात आलेला नाही, याबाबत प्रकल्प यंत्रणेने खात्री केलेली असावी.

८) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची संबंधित अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, जिल्हा परिषद नागपूर यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता प्रचलित प्रक्रिया पूर्ण करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

**२.** उपरोक्त नागरी सुविधा कामावरील खर्च “मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०२ पूर, चक्रीवादळे इत्यादि, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा चावडी, विदयुत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून करण्यात येईल.

३. संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, जिल्हा परिषद, नागपूर यांनी प्रस्तुत नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल / खर्चाच्या प्रगतीचा अहवाल यासह निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानूसार जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत निधीची मागणी करण्यात यावी. तसेच कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद नागपूर यांनी उपरोक्त लेखाशिर्षाखाली निधी उपलब्ध आहे, याची खात्री करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत. सदरची नागरी सुविधांची कामे निधी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आर्थिक वर्षात पूर्ण करण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील. सदरच्या सुविधा कामांसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने प्रलंबित उपयोजन प्रमाणपत्रे (Utilisation Certificates) प्राथम्याने सादर करावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१२१५३८५७९७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dhananjay
Mahesh Nayak

Digitally signed by Dhananjay Mahesh Nayak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6b0b3c8a4f4c652713fe2c8b99ad7967bd31987605a3a9e2101334fdc07193a3, serialNumber=cb5501110714de26ce81e7da03153eb0f69a36c6bdc2940d70cfee5ed94e63bf, cn=Dhananjay Mahesh Nayak
Date: 2022.05.12 16:17:29 +05'30'

**( ध. म. नायक )**

शासनाचे उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) नागपूर विभाग, नागपूर.
२. उप आयुक्त (पुनर्वसन ), औरंगाबाद विभाग, नागपूर.
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, नागपूर.
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई -१ / नागपूर-२ (२ प्रतीत).
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई -१ / नागपूर-२ (२ प्रतीत).

७. जिल्हा कोषागार अधिकारी,  नागपूर.

८. वित्त विभाग,कार्यासन व्यय ९/ व्यय १०/ अर्थसंकल्प - ६, मंत्रालय, मुंबई  ४०० ०३२.

९. कार्यासन अधिकारी, कार्या. ब-१/ कार्यासन -पी.ए.सी., महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई  ४०००३२..

१०. निवड नस्ती, कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मंबई ४०० ०३२.